रजेशिवाय असलेल्या अनुपस्थितीच्या काला-
वधीचे भूतलक्षी प्रभावाने असाधारण रजेमध्ये
परिवर्तन करण्यासंबंधातील अधिकार.

महाराष्ट्र शासन

वित्त विभाग,

शासन निर्णय क्रमांक:- अरजा-2493/प्र.क्र.80/93/सेवा-9,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 12 ऑगस्ट 1994.

शासन निर्णय

महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 नुसार शासनाने अधिकार प्रत्यायोजित केलेले अधिकारी म.ना.से.(रजा) नियम, 1981 च्या परिशिष्ट एक मध्ये नमूद करण्यात आलेले आहेत. या परिशिष्टातील अ. क्र. 10 मध्ये नियुक्ती करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यास म.ना.से. (रजा) नियम, 1981 च्या नियम 63 (6) च्या तरतुदीनुसार अस्थायी कर्मचा-यांच्या बाबतीत नव्वद दिवसांपर्यन्त आणि स्थायी कर्मचा-यांच्या बाबतीत एक वर्षापर्यन्त रजेशिवाय असलेल्या अनुपस्थितीच्या कालावधीचे भूतलक्षी प्रभावाने असाधारण रजेत परिवर्तन करण्याचे अधिकार प्रत्यायोजित करण्यात आलेले आहेत. या अधिका-यांच्या निश्चित मर्यादेबाबत शंका निर्माण झालेली होती.

2. शासन आता असा आदेश देत आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 च्या परिशिष्ट एक मधील अ. क्र. 10 समोरील सध्याच्या तरतुदी खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहेत :-

| अनु-क्रमांक | नियम क्रमांक | अधिकाराचे स्वरुप | अधिकार प्रत्यायोजित केलेला प्राधिकारी | व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| (1) | (2) | (3) | (4) | (5) | (6) |
| 10 | 63(6) | रजेशिवाय अनुपस्थित राहिल्याचा काला-वधी भूतलक्षी प्रभावाने असाधारण रजेमध्ये परिवर्तित करण्याचा अधिकार. | नियुक्त्या करण्यास सक्षम असणारे प्राधिकारी. | अस्थायी शासकीय कर्म-चा-यांच्या बाबतीत नव्वद दिवसांपर्यन्त आणि स्थायी शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत एक वर्षापर्यन्त. मात्र वरील मर्यादेच्या पलिकडील रजा मंजूर करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. | |

3. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 मधील त्यासंबंधीच्या विद्यमान तरतुदीमध्ये या शासन निर्णयाच्या तरतुदीपुरती सुधारणा करण्यात आली आहे असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमांत यथावकाश रीतसर सुधारणा करण्यात येईल.

4. या शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श.स. वसनाक,
शासनाचे अवर सचिव.

शामपु-सेवा-विवि-पत्र-998(12000+40-8-94)1.

Power to commute retrospectively periods of absence without leave into Extra Ordinary Leave.

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
Finance Department,
Government Resolution No. LVE-2493/CR-80/93/SER-9,
Mantralaya, Bombay 400 032, dated the 12th August 1994.

RESOLUTION

Authorities to whom powers under the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 have been delegated by Government are indicated in Appendix-I of the aforesaid rules. As per Sr. No. 10 of the said Appendix, powers to commute retrospectively periods of absence without leave into Extra Ordinary Leave limited to 90 days in respect of temporary Government servants and One year in respect of permanent Government servants, in accordance with the provisions of Rule 63(6) of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981, have been delegated to the authorities competent to make appointments. A doubt has been raised regarding the exact scope of the power.

2. Government is now pleased to decide that the existing provisions shown against Sr. No. 10 of Appendix-I of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 should be revised as under :-

| Sr. No. | No.of Rule | Nature of Powers | Authority to whom power is delegated | Scope | remarks |
|---|---|---|---|---|---|
| (1) | (2) | (3) | (4) | (5) | (6) |
| 10 | 63(6) | Power to commute .. retrospectively periods of absence without leave into Extra Ordinary Leave. | Authorities competent to make appointments. | Limited to 90 days in respect of temporary Government servants. and One year in respect of permanent Government servants. However, powers to sanction leave beyond the above limits are vested in Government. | |

3. The existing provisions of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 in this respect should be deemed to have been

amended to the extent of the provisions of this Resolution. A formal amdndment to these rules will be made in due course.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

S. S. BASNAK,
Under Secretary to Government.